मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार राज्यातील न्यायालयांमध्ये Vulnerable witness deposition center स्थापन करण्यासाठी निधी उपलब्ध करण्याच्या अनुषंगाने वित्त विभागातील Nodal Officer यांची नेमणूक करणेबाबत ----------------

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः याचिका-२०२२/प्र.क्र.१८/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०८ मार्च, २०२२

वाचा :- प्रबंधक (विधि व संशोधन) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र No. Legal/ MA.No..१८५२/२०१९(S.C.)/७७/२०२२, दिनांक ०२.०२.२०२२

**प्रस्तावना :-**

राज्यातील न्यायालयांमध्ये Vulnerable witness deposition centre स्थापन करण्यासंदर्भात Miscellaneous Application No.1852 of 2019 in Criminal Appeal No. 1101 of 2019 मध्ये मा.सर्वोच्च न्यायालय यांनी दिनांक 11.01.2022 रोजी आदेश पारित केले असून सदर आदेशातील परिच्छेद क्रमांक 5 मधील (vi) मध्ये खालीलप्रमाणे नमूद केले आहे :-

"Upon the estimation of costs prepared by the VWDC Committee of each High Court, the State Government shall expeditiously sanction the requisite funds within a period of three months from the date of the submission of the proposal or the end of the financial year, whichever is earlier and disburse the funds to the High Court in accordance with the project plan. The State Government shall nominate a Nodal Officer of the Finance Department who shall be associated ex officio with the work of the VWDC Committee of the High Court, to facilitate the implementation of the proposal submitted by the High Court in terms of these directions."

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशानुसार कार्यवाही करण्यासंदर्भात प्रबंधक (विधि व संशोधन) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी संदर्भाधिन दिनांक ०२.०२.२०२२ च्या पत्रान्वये विनंती केली आहे. त्यास अनुलक्षून Vulnerable Witness Deposition Centre स्थापन करण्याच्या दृष्टीने आवश्यक निधी मंजूर करणे व त्याचे वितरण करण्यासंदर्भात वित्त विभागातील नोडल ऑफीसरची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील न्यायालयामध्ये Vulnerable witness deposition centre स्थापन करण्यासंदर्भात Miscellaneous Application No.1852 of 2019 in Criminal Appeal No. 1101 of 2019 मध्ये मा.सर्वोच्च न्यायालय, यांनी दिनांक ११.०१.२०२२ रोजी पारित केलेल्या आदेशानुसार Vulnerable Witness Deposition Centre स्थापन करण्यासाठी आवश्यक निधी मंजूर करणे व त्याचे वितरण करण्याकरिता **सह सचिव / उप सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई** यांची नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३६/व्यय-५, दिनांक ०४.०३.२०२२ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०८१३४५१८९८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2022.03.08 13:46:37 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,
२. प्रबंधक, निरीक्षणे १/२, मा.उच्च न्यायालय मुंबई
३. सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालये
४. सह सचिव / उप सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सह सचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. कक्ष अधिकारी, का.२३/११/९, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती (का.१२).